सार्वजनिक मालकीच्या जमिनीवरील झोपडयांचा पुनर्विकास करताना खाजगी विकासकांकडून अधिमुल्य (प्रिमियम) आकारणी करण्याबाबत मार्गदर्शक तत्वे.

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्र. झोपुयो-२००८/प्र.क्र.२३६/झोपसु-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २२ मार्च, २०२२

**वाचा :-**

१) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग समक्रमांक दि.२६.०५.२००९
२) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग समक्रमांक दि.०२.०७.२०१०
३) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग समक्रमांक दि.२२.०९.२०२०
४) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग समक्रमांक दि.१२.०७.२०२१

**प्रस्तावना :-**

झोपडपट्टीमुक्त मुंबई आणि पर्यायाने झोपडपट्टीमुक्त महाराष्ट्र करण्याच्या उदात्त हेतुने शासन झोपडपट्टी पुनर्वसन योजना राबवित आहे. सुरुवातीला नोटबंदी आणि अलिकडील कोरोना सारख्या जागतिक महामारीमुळे खाजगी विकासकांची आर्थिक स्थिती नाजूक झालेली आहे. परिणामी झोपडपट्टी पुनर्वसन योजना राबविणे खाजगी विकासकांना आर्थिकदृष्ट्या अडचणीचे ठरत आहे. किंबहुना पुनर्वसन योजनेच्या अंमलबजावणीत अपेक्षित गती राखणे दिवसेंदिवस अवघड होत चालले आहे. यास्तव, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणामार्फत वसूल करावयाच्या जमीन अधिमुल्याचे टप्पे व १०:१०:८० या प्रमाणात दर निश्चित करुन विकासकांना अधिमूल्य भरण्यास दि.३१ मार्च, २०२१ पर्यंत सवलत देण्याचा निर्णय संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. तसेच सदर सवलतीस दि.३० सप्टेंबर, २०२१ पर्यंत मुदतवाढ देण्याचा निर्णय संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. दि.३० सप्टेंबर, २०२१ पर्यंत देण्यात आलेली सदर सवलतीची मुदत वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणामार्फत वसूल करावयाच्या अधिमुल्याचे टप्पे व १०:१०:८० अशा प्रमाणात निश्चित केलेल्या दरानुसार विकासकांना जमीन अधिमुल्य (Premium) भरण्यासाठी दि.३० सप्टेंबर, २०२१ पर्यंत दिलेली सवलत दि.३० सप्टेंबर, २०२२ पर्यंत वाढविण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३२२१६२५५६०७०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MYLAWARAM
DURGAPRASAD P

Digitally signed by MYLAWARAM DURGAPRASAD P
DN: CN = MYLAWARAM DURGAPRASAD P, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOUSING DEPARTMENT
Date: 2022.03.22 16:29:37 +05'30'

**(दुर्गाप्रसाद मैलावरम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई- ३२.
३. मा.मंत्री (गृहनिर्माण)/ मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (गृहनिर्माण), गृहनिर्माण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा-कुर्ला कॉम्प्लेक्स, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१
८. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण,प्रशासकीय इमारत, अनंत काणेकर मार्ग, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१
१०. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे व पिंपरी चिंचवड क्षेत्र, पुणे.
११. सर्व विभागीय आयुक्त.
१२. आयुक्त बृहन्मुंबई महानगरपालिका.
१३. वित्त नियंत्रक, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण,प्रशासकीय इमारत, अनंत काणेकर मार्ग, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१
१४. आयुक्त, पुणे/पिंपरी चिंचवड/नागपूर, ठाणे महानगरपालिका
१५. जिल्हाधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर जिल्हा/नागपूर, पुणे
१६. अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का), पश्चिम उपनगरे, नवीन प्रशासकीय भवन, वांद्रे.
१७. अपर जिल्हाधिकारी (अति/निष्का),पूर्व उपनगरे, चर्चगेट स्टेशनसमोर, चर्चगेट, मुंबई.
१८. अपर जिल्हाधिकारी, मुंबई शहर, जुने जकात घर, फोर्ट, मुंबई.
१९. उपजिल्हाधिकारी तथा सक्षम प्राधिकारी, मुंबई महानगर प्रदेश झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, ठाणे